**निरा-देवघर पाटबंधारे प्रकल्प, तालुका - भोर, जिल्हा-पुणे प्रकल्पाच्या रुपये ३९७६.८३ कोटी इतक्या किंमतीस तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सुप्रमा-११२२/प्र.क्र.४२७/२०२२/मोप्र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०८ मार्च, २०२३

संदर्भ :-१) शासन निर्णय क्र. एन आय आर १०८२/१२६६/(२५३०)/ज संअ(१), दि.२९/०५/१९८४.
२) महामंडळाचे पत्र क्र.म.कृ.खो.वि.म./निदेप्र/२९८/(६६९/९८)/सु.प्र.मा./मो.प्र.-१/४९६६, दि.२९/०५/२०००.
३) महामंडळाचे पत्र क्र म.कृ.खो.वि.म./निदेप्र/२०२/(३४१/०२)/द्वि.सु.प्र.मा./मो.प्र.-५/८१०४, दि.१६/१०/२००२.

**प्रस्तावना :**

निरा-देवघर धरण हे पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्यातील देवघर गावाजवळ निरा नदीवरील सुरुवातीचे मोठे धरण असून या प्रकल्पाचे लाभक्षेत्र कृष्णा खोऱ्यामध्ये आहे. हा प्रकल्प महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळांतर्गत "उर्वरित महाराष्ट्र" या प्रदेशामध्ये आहे. धरणाचा एकूण पाणीसाठा १२.९८ अ.घ.फू. इतका आहे. या प्रकल्पाचे दोन कालवे असून उजवा कालवा १५८ किमी लांबीचा व डावा कालवा १८ किमी लांबीचा आहे. निरा-देवघर प्रकल्पाच्या कालव्यामुळे भोर तालुक्यातील ६६७० हेक्टर, खंडाळा तालुक्यातील ११८६० हेक्टर, फलटण तालुक्यातील १३५५० हेक्टर व माळशिरस तालुक्यातील १०९७० असे एकूण ४३०५० हेक्टर क्षेत्रास आठमाही पिकरचनेनुसार सिंचन लाभ मिळणार आहे.

सदर प्रकल्पास सन २०००-०१ चे दरसुचीवर आधारीत रु. ९१०.९१ कोटीस द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

निरा-देवघर धरणाचे काम पूर्ण झाले असून वितरण व्यवस्थेचे काम प्रगतीत आहे. द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यतेनंतर प्रामुख्याने दरसुचीत वाढ झाल्याने, भुसंपादन खर्चात वाढ झालेने, तसेच संकल्पनातील बदल, काही धोरणात्मक बदल यामुळे प्रकल्प किंमतीत वाढ झाली आहे. त्यामुळे महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने तृतीय सुधारीत प्रकल्प अहवाल मान्यतेस्तव शासनास सादर केला आहे. या प्रकल्प अहवालास राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने त्यांच्या ६९ बैठकीमध्ये शिफारस केली आहे.

मा.मंत्रीमंडळाने बांधकामाची सद्य:स्थिती, किंमत वाढीची कारणमिमांसा, प्रकल्पातील कामाच्या अनुषंगाने सातारा जिल्हयातील अवर्षण प्रवण खंडाळा व फलटण तालुके आणि सोलापूर जिल्हयातील माळशिरस या तालुक्यांना सिंचनाचा लाभ मिळण्याच्या उद्देशाने जलसंपदा विभागाच्या २०२२-२३,

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या २०२२-२३ आणि महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सन २०२१-२२ च्या दरसूचीवर आधारीत रुपये ३९७६.८३ कोटी किमंतीच्या तृतीय सुधारीत प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :**

निरा देवघर प्रकल्प, तालुका भोर, जिल्हा पुणे या प्रकल्पाच्या रुपये ३९७६.८३ कोटी किंमतीस प्रत्यक्ष कामासाठी रुपये ३६०२.८८कोटी व अनुषंगीक खर्च रुपये ३७३.९५ कोटी खालील अटींच्या अधीन राहून तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. गावडेवाडी, शेखमीरवाडी व वाघोशी या तीन उपसा सिंचन योजनांची संकल्पने व रेखाचित्रे मध्यवर्ती संकल्पचित्र संघटनेकडून प्राप्त होऊन अंतिम झाल्यावरच निविदा कार्यवाही करण्यात यावी.

२. प्रकल्पाचे काम नियोजनानुसार व सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

३. संपूर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणी वापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणी वापर संस्थेस हस्तांतरित करावे.

४. सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहीत केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

५. सदर प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपध्दतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाह्य कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक अनियमितता निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना सहमती आहे असे गृहीत धरता येणार नाही.

६. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील मुद्यांची पुर्तता करावी.

७. आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.

८. निरा देवघर प्रकल्पाच्या एकुण पाणी वापरा मधुन ०.९३ अ.घ.फु पाणी धोम बलकवडी प्रकल्पा साठी देण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

प्रकल्पाचा उपशिर्षनिहाय तरतूदीचा गोषवारा परिशिष्ट “अ”सोबत जोडला आहे.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, (८०) सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०२) योजनांतर्गत, (०२) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली

अंशदान (उर्वरित महाराष्ट्र) (संगणक सांकेतांक ४७०१ एच -६२९ ) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१९०/२०२२ का.१४३४ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.३८९/व्यय-१२, अन्वये तसेच मा. मंत्रिमंडळाने बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२३०३०८१८०६१३११२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD RAMCHANDRA NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: CN = PRASAD RAMCHANDRA NARVEKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.08 18:11:26 +05'30'

**( प्रसाद नार्वेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :-** परिशिष्ट “अ”

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. मंत्री,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.

**शासन निर्णय क्रमांक: सुप्रमा-११२२/प्र.क्र.४२७/२०२२/मोप्र-१, दि. ०८ मार्च, २०२३**

**उपशिर्षनिहाय तरतूदीचा गोषवारा**

**परिशिष्ट "अ"**

| अ.क्र. | उपशिर्ष | मंजूर द्वितीय सुप्रमा नुसार तरतूद | तृतीय सुप्रमानुसार तरतूद |
|---|---|---|---|
| I - मुख्य कामे | | | |
| १ | ए-प्राथमिक कामे | ०.५७ | १.१४ |
| २ | बी-भूसंपादन | १२७.५६ | १७९.४० |
| ३ | सी-कामे | १८५.६६ | १९२.५१ |
| ४ | डी-विमोचक | ३१.३ | २६.५५ |
| ५ | के-इमारत | २.७३ | २.५१ |
| ६ | एम-वनीकरण | ०.२४ | ०.०० |
| ७ | ओ-संकिर्ण | २.०० | १.२८ |
| ८ | पी-देखभाल | ०.९१ | १.३५ |
| ९ | क्यु-हत्यारे व संयंत्रे | ०.५३ | ०.०० |
| १० | आर-दळणवळण | ०.०६ | ०.०० |
| ११ | एक्स-पर्यावरण | ०.०० | १०.७२ |
| १२ | एकूण | ३५१.५६ | ४१५.४६ |
| १३ | आस्थापना व अनुषंगिक | ३८.५५ | ४९.५९ |
| | एकूण (अ) | ३९०.११ | ४६५.०५ |
| II मुख्य कालवे | | | |
| १ | ए-प्राथमिक कामे | ५.३६ | ३.५५ |
| २ | बी-भूसंपादन | ९.४५ | १४७.२१ |
| ३ | सी- i) कामे (अस्तरीकरण) | ५५.८२ | १९६.०१ |
| | ii) उर्सियो | ७९.७३ | १३०.६९ |
| | एकूण- सी (i+ii) | १३५.६ | ३२६.७० |
| ४ | डी-विमोचक | ४.५८ | १४.७१ |
| ५ | ई- प्रपात | ०.०० | ०.०० |
| ६ | एफआरएचटी-बांधकामे | ४१.८७ | ७१.७५ |
| ७ | जी-पूल | १२.३९ | १०.०९ |
| ८ | एच-एस्केप | ०.८९ | २.८२ |
| ९ | के-इमारत | ११.४३ | १५.२१ |
| १० | एल-i) मातीकाम | १५४.१० | १०९.८८ |
| | ii) बोगदे | २.४० | २९.५० |

| अ.क्र. | उपशिर्ष | मंजूर द्वितीय सुप्रमा नुसार तरतूद | तृतीय सुप्रमानुसार तरतूद |
|---|---|---|---|
| | iii) बंदिस्त नलिका | ०.०० | १९२२.११ |
| | एकूण- एल (i+ii+iii) | १५६.५१ | २०६१.४९ |
| ११ | एम-वनिकरण | १.०६ | ०.५२ |
| १२ | ओ-संकिर्ण | ३.०९ | ०.०८ |
| १३ | पी-देखभाल | ३.१० | ११.४२ |
| १४ | क्यु-हत्यारे व संयंत्रे | ०.४४ | ०.०० |
| १५ | आर-दळणवळण | ४.२७ | ७.२६ |
| १६ | एक्स-पर्यावरण | ०.०० | ०.६५ |
| १७ | यु-वितरीका | ७७.३७ | ५१३.९५ |
| | एकूण | ४६७.३६ | ३१८७.४३ |
| | आस्थापना व अनुषंगिक | ५३.४३ | ३२४.३६ |
| | एकूण (ब) | ५२०.७९ | ३५११.७८ |
| | एकूण ( अ+ब ) | ९१०.९० | ३९७६.८३ |

PRASAD RAMCHANDRA NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: CN = PRASAD RAMCHANDRA NARVEKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.08 18:11:45 +05'30'

( प्रसाद नार्वेकर )

उप सचिव, महाराष्ट्र शासन